आम आदमी विमा योजना शिष्यवृत्तीच्या डेटा
एंट्रीचे शाळांना अधिकार देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आआवि २०१४ / प्र.क्र.१४४-अ /विसयो-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार इमारत, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक : ६ मे, २०१५**

वाचा--

१) शासननिर्णयक्रमांकःआआवि २०१३/प्र.क्र.६६/विसयो-२, दिनांक २७ ऑक्टोबर,२००७
२) शासननिर्णयक्रमांकःआआवि २०१३/प्र.क्र.६६/विसयो-२, दिनांक ८ जानेवारी,२०११
३) शासननिर्णयक्रमांकःआआवि २०१३/प्र.क्र.६६/विसयो-२, दिनांक १५ जानेवारी,२०११
४) शासननिर्णयक्रमांकःआआवि २०१३/प्र.क्र.६६/विसयो-२, दिनांक १२ जून, २०१३

**प्रस्तावना–**

राज्यात २७ ऑक्टोबर,,२००७ रोजीच्या शासन निर्णयानुसार आम आदमी विमा योजना ही योजना लागू झाली आहे. शासनाने मे,२००९ मध्ये प्रथमत: या योजनेचा आढावा घेतला असता ४९ मृत्यूचे दावे, शुन्य शिष्यवृत्ती व अंदाजे ३ लाख लाभार्थ्यांची LIC च्या सॉफ्टवेअरवर नोंद व ६ ते ७ लक्ष लाभार्थ्यांची नांवे विमा संस्थेकडून नोंदणीच्या मार्गावर अशाप्रकारची वस्तुस्थिती होती.

सुरुवातीस अशा लाभार्थ्यांचा अर्ज तलाठी भरुन घेत असतात व असे खेडेनिहाय अर्ज जिल्हा कार्यालयामार्फत विमा संस्थेला डेटा एंट्री करीता देण्यात येत असतात. सन २०१० प्रमाणे या कार्यप्रणालीत गती वाढविण्याचे शासनाने धोरण स्वीकारले व विमा संस्थांना कागदी अर्ज न देता एक्सलशीटमध्ये असा डेटा टंकलेखित करुन CD किंवा DVD मध्ये देण्याची कार्यप्रणाली सुरु केली आहे.

सन २०१२ प्रमाणे CD किंवा DVD बरेचदा ओपन न होणे, व्हायरस जावून DVD खराब होणे याचा अनुभव घेऊन ईमेल प्रणालीचा विचार सुरु झाला. CD, DVD व ईमेल कार्यप्रणालीचा पुढचा टप्पा म्हणजे www.aaby.mahaonline.gov.in या सॉफ्टवेअरमधून नवीन अर्जाची तसेच शिष्यवृत्तीच्या ऑनलाईन डेटा एंट्रीचा विचार करण्यांत आला व २६ जानेवारी,२०१३ रोजी बुलढाणा तसेच नांदेड येथे या सॉफ्टवेअरचे उदघाटन करण्यात आले.

आज या सॉफ्टवेअरवर LIC संस्थेकडून घेतलेला डेटा ५३ लक्ष लाभार्थ्यांना उपलब्ध आहेत. सन २०१३-१४ या वर्षी ५.५० लक्ष विद्यार्थ्यांनी शिष्यवृत्तीच्या हेतूने ऑनलाईन अर्ज दाखल केले होते. त्यापैकी २.३० लक्ष विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मिळाली. मात्र याची वाटचाल २० लक्ष शिष्यवृत्तीपर्यन्त करावयाची आहे. यावर्षी मागील वर्षाचा अनुभव लक्षात घेवून नोंदणी होईल असे वाटले होते. प्रत्यक्षात मात्र ३३७२४४ लाभार्थ्यांनी या योजनेचे लाभार्थी होण्यास २२ रुपये ७५ पैसे खर्च करुन नोंदणी केली. शासनाकडे अंदाजे २८६ आयटी असिस्टंट या कामासाठी ३४ जिल्हयात उपलब्ध आहेत. त्यांचेकडून फक्त ७६३० अर्जाची डेटा एंट्री झाली. याशिवाय ज्या विद्यार्थ्यांकडे पालकाचा एलआयसी आयडी आहे अशा १६९४०२ विद्यार्थ्यांनीच फक्त शिष्यवृत्तीसाठी अर्ज केलेत.

सद्यस्थितीत विद्यार्थ्यांने महा ई सेवा केंद्रात अर्ज भरल्यानंतर ते तहसिलदार,संजय गांधी योजना, विमा संस्था यांचेमार्फत परत असा प्रवास करुन विद्यार्थ्यांच्या खात्यात शिष्यवृत्ती जमा होते. तथापि शालेय शिक्षण यंत्रणा व महसूल यंत्रणा यांच्या कार्यकक्षा वेगवेगळया असल्यामुळे संजय गांधी योजना तहसिलदार यांना या शिष्यवृत्तीच्या अर्जांना मंजुरी देताना काही शंका/अडीअडचणी उद्भवल्या तर त्या सुकर करण्यास विलंब लागतो. याउलट शाळांनी केलेली शिष्यवृत्तीची डेटा एंट्री ही कार्यप्रणाली यावयास पुढील वर्षाची डेटा एंट्री बिनचूक व जलद होऊ शकेल. याबाबत ९ मार्च,२०१५ रोजी संचालक,सामाजिक न्याय, पुणे, आयुक्त व संचालक, शालेय

शिक्षण, पुणे यांच्यामध्ये चर्चा झाली. सदर चर्चेस LIC, महाऑनलाईन, मास्टेंक, ॲसेंच्युअर उपस्थित होते. सदर चर्चेच्या अनुषंगाने शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे --

**शासन निर्णय** --

१) हा शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून मुख्याध्यापकांना ज्या पात्र विद्यार्थ्यांकडे पालकाचा विमा क्रमांक आहे अशा विद्यार्थ्यांची ऑनलाईन डेटा एंट्री करण्यास शाळांना अधिकार द्यावेत.

२) सद्यस्थितीत लाभार्थ्यांचा अर्ज मंजूर करणे किंवा शिष्यवृत्ती विमा संस्थेला पाठविणे ही जबाबदारी संजय गांधी योजना तहसिलदार पार पाडीत आहेत. यापुढेही अशा शिष्यवृत्तीचा प्राप्त झालेला ऑनलाईन डेटा तपासून मंजूर करण्याचे व LIC ला संजय गांधी योजना तहसिलदार यांनी पाठवले ही वहीवाट कायम राहील..

सद्यस्थितीत कार्यरत असलेली कार्यपध्दती सुधारित कार्यप्रणालीमध्ये प्रस्तावित कार्यप्रणाली ही खालील प्रमाणे राहील --

| अ.क्र. | सद्यस्थिती मधील कार्यप्रणाली | सुधारित कार्यप्रणाली |
|---|---|---|
| १ | सद्यस्थितीत भुमीहीन शेतमजूर किंवा अल्पभूधारक हा तलाठयाकडे किंवा अन्यत्र आम आदमी विमा योजनेचा फॉर्म प्राप्त करतो तो स्वत: व्यवस्थितपणे व बिनचूकपणे भरुन तलाठयाच्या सही,शिक्का घेतो व महा ई सेवा केंद्रात जावून अपलोड करतो. | १)स्तंभ २ प्रमाणे ही कार्यवाही जशीच्या तशी राहील.<br>२)ज्या शाळांमध्ये विद्यार्थ्यांच्या वडीलांचा ID आवश्यक आहे त्या ठिकाणी शाळासुध्दा अशी नोंदणी करु शकेल. (महाऑनलाईनने अशी सुविधा जून,२०१५ पर्यन्त करुन द्यावी.) |
| २ | ९ वी ते १२ वी च्या शिष्यवृत्तीला पात्र असे विद्यार्थी की ज्यांच्याकडे वडीलांचा विमा क्रमांक नाही ते शाळेमध्ये अर्ज भरतील. त्यावर वडीलांची सही घेतील व शाळेत एखाद्या आठवडयात तलाठी शाळेत येतील व पात्र अर्ज म्हणजे त्या मुलाचे वडील आम आदमी विमा योजनेस पात्र आहेत अशा अर्जावर सही व शिक्का घेऊन प्रमाणित करतील व हा विद्यार्थी महा ई सेवा केंद्रात जावून वडीलांचा आम आदमी विमा योजना विमा क्रमांक मिळविण्याकरता अर्ज अपलोड करेल. | १)या कार्यप्रणालीमध्ये सुध्दा काहीही बदल असणार नाही.<br>२) किंवा वरील प्रमाणे महाऑनलाईनने ही सुविधा उपलब्ध केल्यानंतर शाळेत सुध्दा अशी डेटा एंट्री करता येईल. |
| ३ | सद्यस्थितीत विद्यार्थी शिष्यवृत्तीचा अर्ज स्वत: भरतो. त्यामधील शिक्षक ते बिनचूक असल्याची खात्री करतात व मुख्याध्यापक हे विद्यार्थी पास होऊन वरच्या वर्गात आलेला आहे असे प्रमाणित करतात. यानंतर हा विद्यार्थी हा अर्ज महा ई सेवा केंद्रात जावून २२ रुपये ७५ पैसे देवून ऑनलाईन पध्दतीने अपलोड करतो. | आदेश निर्गमित केल्याच्या दिनांका पासून अशा पात्र शाळांना युझर आयडी व पासवर्ड देण्यात येतील व शाळा हे अर्ज स्वत:च्या जबाबदारीवर बिनचूकपणे www.aaby.mahaonline.gov.in या वेबसाईटवर अपलोड करतील. |

| | | |
|---|---|---|
| ४ | सद्यस्थितीत ज्या ठिकाणी महा ई सेवा केंद्र कमी पडतात किंवा त्यांच्याकडून पुरेशा गतीने अर्ज अपलोड होऊ शकत नाही अशा प्रकरणी जिल्हा कार्यालयास दिलेल्या ५ ते ९ आयटी असिस्टंटकडून हा ऑनलाईन डेटा एंट्री करण्याची पर्यायी व्यवस्था आहे. | जिल्हाधिकारी यांनी स्वत: ज्या जिल्हयामध्ये अशा डेटा एंट्रीची आयटी असिस्टंटमार्फत आवश्यकता असेल तशी तेथील गरज पूर्ण करतील. |
| ५ | मे,२०१४ पर्यन्त महा ई सेवा केंद्राने अपलोड केलेले अर्ज संजय गांधी योजना तहसिलदार दर आठवडयाला डाऊनलोड करुन ईमेल पध्दतीने ७ विमा कार्यालयांना पाठविते व ईमेल पध्दतीनेच या तहसिल कायार्लयांना विमा क्रमांक किंवा शिष्यवृत्ती मंजूर झाल्याचे ईमेल प्राप्त होत असतात. | जून,२०१४ पासून वेब कनेक्टीव्हीटी १०० टक्के कार्यान्वीत झाली असून व ईमेल कार्यप्रणाली सद्यस्थितीत महाऑनलाईन कडून डेटा LIC कडे पाठविला जातो तो तहसिलदार,संजय गांधी योजना व शिष्यवृत्तीचे फॉर्म मंजूर करतील. |
| ६ | क्रमांक ५ मध्ये तहसिलदार यांना शिष्यवृत्तीचे अर्ज मंजूर करण्याचे अधिकार सद्यस्थितीत आहेत. | हीच कार्यप्रणाली यापुढे कार्यान्वीत राहील. |

सद्यस्थितीत अल्पसंख्यांक शिष्यवृत्ती तसेच सावित्रिबाई फुले शिष्यवृत्ती यांची शाळा,शाळेच्या कामकाजाचा भाग म्हणून मोफत डेटा एंट्री करतात. आम आदमी विमा योजना शिष्यवृत्तीचे अर्ज अपलोड करण्याबाबत शाळेने हे अर्ज मोफत भरावेत व किती फी आकारावी याबाबत शिक्षणाधिकारी (माध्यमिक) यांनी शाळांसमवेत चर्चा करुन त्यांचे अभिप्राय या विभागास स्वतंत्रपणे पाठवावेत. म्हणजे जून,२०१६ पासून निश्चित फी आकारण्याबाबत स्वतंत्रपणे निर्णय घेण्यात येईल. तोपर्यन्त शाळांनी सन २०१५-१६ या शैक्षणिक वर्षात मोफत किंवा विद्यार्थ्याला शिष्यवृत्ती मिळाल्यानंतर फी घेईल या अटीवर अशी डेटा एंट्री करावी असे शासनास वाटते. एकवेळ आपण १०० टक्के उद्दिष्टाकडे पोहोचतो. विद्यार्थ्यांना/पालकांना या डेटा एंट्रीच्या फी बाबत काही नाराजी/तक्रार असणार नाही.

school.maharashtra.gov.in या शालेय शिक्षण विभागाच्या वेबसाईटवर आम आदमी विमा योजना यांची महत्वाची पत्रे व या सुधारित धोरणाबाबतचे शासन निर्णय/टिप्पण्या/युझर ॲन्युअल/अपलोड करण्याचे शालेय शिक्षण विभागाने ॲसेंच्युअर संस्थेला निर्देश दिले आहेत. ॲसेंच्युअर कंपनीने आवश्यक त्या सुधारित धोरणाबाबत या सॉफ्टवेअरमध्ये हया बाबी समाविष्ट कराव्यात.

सदर शासन निर्णय शालेय शिक्षण विभागाच्या सहमतीने घेण्यात आला आहे. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१५०५०७१२४९२३१९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Uke Ujjwal
Digitally signed by Uke Ujjwal
DN: c=IN, o=ALL INDIA SERVICE, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uke Ujjwal
Date: 2015.05.07 12:59:26 +05'30'

( उज्ज्वल उके )
**प्रधान सचिव**

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,

२) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,

३) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

४) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,

५) सर्व जिल्हयांचे पालकमंत्री,

६) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

७) सर्व जिल्हापरिषदांचे अध्यक्ष,

८) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)१/२, महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर

९) सचिव, ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार, कृषि भवन, नवी दिल्ली,

१०) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग,

११) प्रधान सचिव, वित्त विभाग,

१२) प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,

१३) सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,

१४) सचिव, महिला व बालविकास विभाग,

१५) सचिव, नगर विकास विभाग,

१६) सचिव,भारतीय आयुर्विमा महामंडळ, योगक्षेम इमारत, मुंबई

१७) विभागीय विमा अधिकारी ठाणे/पुणे/सातारा/अमरावती/औरंगाबाद/नाशिक/नागपूर,

१८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,

१९) संचालक,नागरी प्रशासन, नवीन प्रशासकीय इमारत,मुंबई,

२०) वित्त विभाग (व्यय-१४/कोषा-४),

२१) सर्व मंत्रालयीन विभाग,

२२) सर्व विभागीय आयुक्त (महसूल),

२३) सर्व महापालिका आयुक्त,

२४) सर्व जिल्हाधिकारी

२५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद (सर्व),

२६) संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,

२७) संचालक, शालेय शिक्षण संचालनालय, पुणे,

२८) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,

२९) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,

३०) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई,

३१) विभागीय समाजकल्याण अधिकारी (मुंबई/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपूर),

३२) सर्व विमा अधिकारी (महाराष्ट्रातील)

३३) सर्व उप विभागीय उप जिल्हाधिकारी (प्रांत अधिकारी)सर्व तहसिलदार/सर्व नायब

३४) तहसिलदार (संगायो),

३५) सर्व कोषागार अधिकारी,

३६) सर्व नगरपालिकांचे मुख्याधिकारी,

३७) सर्व सामाजिक कार्यकर्ते (महिला व बालविकास विभाग),

३८) सर्व पंचायत समित्यांचे गट विकास अधिकारी,

३९) सर्व उपकोषागार अधिकारी,

४०) सर्व ग्रामपंचायती/सर्व सरपंच/सर्व पोलीस पाटील/सर्व तलाठी/सर्व ग्रामसेवक

४१) सर्व उपसचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,

४२) संचालक,शालेय शिक्षण, पुणे

४३) सर्व उपसंचालक, शालेय शिक्षण

४४) सर्व तहसिलदार, संजय गांधी योजना कार्यालय

४५) निवडनस्ती